सन २०२३-२०२४ या वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCP) अर्थसहाय्य.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०२३/प्र.क्र.९५/योजना-३
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एनआरएलएम-२०११/प्र.क्र.१९६/ योजना-३, दिनांक १८ जुलै, २०११.
२. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.मजिअ-२०२३/प्र.क्र.९५/योजना-३, दिनांक २७ सप्टेंबर, २०२३.
३. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.मजिअ-२०२३/प्र.क्र.९५/योजना-३, दिनांक ०५ डिसेंबर, २०२३.
४. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.मजिअ-२०२३/प्र.क्र.९५/योजना-३, दिनांक १३ फेब्रुवारी, २०२४.
५. शासन परिपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.विघयो-२०२४/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प, दिनांक १२ मार्च, २०२४.
६. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.मजिअ-२०२३/प्र.क्र.९५/योजना-३, दिनांक १३ मार्च, २०२४.
७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.३८/अर्थसंकल्प-३, दिनांक २० मार्च, २०२४.
८. केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जे-१२०२५/०१/२०२३-आरएल (एनआरएलएम_११२ बी), दिनांक २९ मार्च, २०२४.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, उमेद - महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एमएसआरएलएम/लेखा/६२८२/२०२४, दिनांक २९ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCP) अर्थसहाय्य या योजनेकरिता अतिरिक्त तिसरा हप्ता म्हणून रु.४१,४१,८४,०००/- इतका निधी संदर्भाधीन क्र.८ अन्वये वितरीत केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. सन २०२३-२४ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्ग (SCP) केंद्र हिस्सा (२५०१ ए०८४) याकरिता रु.२८६,५८,६८,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली असून त्यापैकी रु.७४,४२,६०,०००/- इतकी रक्कम अद्यापर्यंत वितरीत केली आहे. तसेच केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ ए०९३) याकरिता रु.१९१,०५,७९,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत

करण्यात आली असून त्यापैकी रु.५२,९५,०६,६६८/- इतकी रक्कम अद्यापर्यंत वितरीत केली आहे. आता सदर केंद्र हिस्सा व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला (MSRLM) विशेष घटक योजनेखाली अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCP) अर्थसहाय्य केंद्र हिस्सा (२५०१ ए०८४) याकरिता केलेल्या अर्थसंकल्पीत तरतूदीतून रु.३९,७१,२९,०००/- (रुपये एकोणचाळीस कोटी एकाहत्तर लाख एकोणतीस हजार फक्त) व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ ए०९३) याकरिता केलेल्या अर्थसंकल्पीत तरतूदीतून रु.२६,४७,५२,३३२/- (रुपये सव्वीस कोटी सत्तेचाळीस लाख बावण्ण हजार तीनशे बत्तीस फक्त) असा एकूण रु.६६,१८,८१,३३२/- (रुपये सहासष्ट कोटी अठरा लाख एक्याऐंशी हजार तीनशे बत्तीस फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.३९,७१,२९,०००/- (रुपये एकोणचाळीस कोटी एकाहत्तर लाख एकोणतीस हजार फक्त) इतका खर्च "मागणी क्र.एन-३, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०१) एमएसआरएलएम अंतर्गत वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य (२५०१ ए०८४)" या लेखाशीर्षाखाली व रु.२६,४७,५२,३३२/- (रुपये सव्वीस कोटी सत्तेचाळीस लाख बावण्ण हजार तीनशे बत्तीस फक्त) इतका खर्च "मागणी क्र.एन-३, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०२) एमएसआरएलएम अंतर्गत वित्तीय सहाय्य (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य (२५०१ ए०९३)" या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पीत तरतूदी मधून भागवावा.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षानिहाय / उपलेखाशीर्षानिहाय तसेच साध्य झालेल्या भौतिक उद्दीष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व ग्राम विकास विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

५. सदर अनुदान अनुसूचित जाती व नवबौध्द प्रवर्गासाठी तसेच ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक १२ एप्रिल २०२३ व ०८ डिसेंबर, २०२३ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्यास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. वाचा येथील संदर्भ क्र.७ येथे नमूद वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक २०.०३.२०२४ मधील सूचनांचे तंतोतंत पालन करण्याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३१११३६४०३९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK ASHOK DAINGADE

Digitally signed by VIVEK ASHOK DAINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=53c2fccec74ddb1c052589e5cbaed9d19ba0d0043df169c83be27faeb8bf045b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=670EB0FA576F65F4406D031E11A90EA6FFB3AEFB253D401F5CED2AD1A6605DBF, cn=VIVEK ASHOK DAINGADE
Date: 2024.03.31 12:39:43 +05'30'

**( विवेक दाईंगडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (पाच जादा प्रतींसह)
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
३) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
५) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.

६) कक्ष अधिकारी/अर्थसंकल्प (विघयो) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

७) वित्त विभाग (व्यय-१४) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.

८) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास विभाग.

९) निवडनस्ती.